कोकण विभागातील तलाठी संवर्गातील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्र. आस्था-२०२०/प्र.क्र.६०/ई-१०
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२०

वाचा:-१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.०३.२००६
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आस्था-२०१८/प्र.क्र.१३०(भाग-१) /ई-१०, दि.१९.१०.२०१९
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०
५) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.मशा/आस्था/कार्या-४/इएनजी/मु.वा.प्र./तलाठी/सीआर-२१,२०१९, दि.११.०३.२०२०

प्रास्ताविक:-

कोकण विभागातील तलाठी संवर्गाच्या १४४५ पदांचा आकृतीबंध शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००२/ प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.०३.२००६ अन्वये मंजूर करण्यात आला आहे. या पदांपैकी ४३१ पदे ही अस्थायी असून त्यांना संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० या कालावधीत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदरची मुदत संपुष्टात येत असल्याने वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या अखत्यारितील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान केले आहेत. त्यानुषंगाने विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण यांनी कोकण विभागातील तलाठी संवर्गाच्या अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे. सदर पदांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

१. कोकण विभागातील तलाठी संवर्गातील अस्थायी पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नसल्याचे विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण यांनी प्रमाणित केलेले आहे. सबब, कोकण विभागातील तलाठी संवर्गाच्या, पुढील परिशिष्टात दर्शविलेल्या एकूण-४३१ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

**परिशिष्ट**

| **कोकण विभाग** | | | | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **जिल्हा** | **मंजूर पदे** | **स्थायी पदे** | **अस्थायी पदे** |
| **१** | **मुंबई उपनगर** | ५५ | १८ | ३७ |
| **२** | **ठाणे** | १९६ | १३७ | ५९ |
| **३** | **पालघर** | १८३ | १२७ | ५६ |
| **४** | **रायगड** | ३६८ | २५९ | १०९ |
| **५** | **रत्नागिरी** | ३९८ | ३०७ | ९१ |
| **६** | **सिंधुदुर्ग** | २४५ | १६६ | ७९ |
| | **एकूण** | **१४४५** | **१०१४** | **४३१** |

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च मागणी क्रमांक सी-१-२०५३-जिल्हा प्रशासन-०९४-इतर आस्थापना-०९४(०३) ग्राम अधिकारी-०९४-(०३)(०१) आयुक्त, कोकण वेतने (२०५३ ०३१३) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांनी संदर्भ क्र. ४ वरील शासन निर्णयातील तरतुदींप्रमाणे सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता मिळविण्याकरीता आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : पदनि-२०१६ / प्र.क्र.८ /१६/ आ.पु.क., दि. १२ फेब्रुवारी, २०२० अन्वये सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३०१३२५३८९६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Raghuvir D Katke

Digitally signed by Raghuvir D Katke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f594954bd799968aa50aaa40154cd3ad3a036295890af4cd43ecc9f22dcb87a, serialNumber=c7afd3f6d4faa0e6c98e10d28dc71b935654c783f0397a6cdbefaeb5f6eef9da, cn=Raghuvir D Katke
Date: 2020.03.30 13:29:56 +05'30'

**( रघुवीर कटके )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२) महालेखापाल-१ /२ (लेखा परीक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर

३) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर / ठाणे / पालघर / रायगड / रत्नागिरी / सिंधुदूर्ग

४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

५) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई उपनगर / ठाणे / पालघर / रायगड / रत्नागिरी / सिंधुदूर्ग

६) वित्त विभाग ( आ.पु.क. / व्यय-९ कार्यासन), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

७) अवर सचिव (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

८) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

९) निवड नस्ती (कार्यासन ई-१०), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.